**महाराष्ट्र शासन**

क्रमांक : वैखप्र २०१८/प्र.क्र.११९/परिचर्या
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार (७वा मजला),
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : १८ फेब्रुवारी २०१९.

**विषय :** श्री.रामकृष्ण रतनराव शेंदारकर, पुरूष परिसेवक, छत्रपती प्रमिलाराजे सर्वोपचार रूग्णालय, कोल्हापूर यांची मुलगी कु.श्रेया रामकृष्ण शेंदारकर हिस उद्भवलेल्या आकस्मिक आजारावर झालेल्या वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती मंजूर करणेबाबत.

**ज्ञापन -:**

संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांना त्यांच्या क्र.संवैशिवसं/वैखप्र/श्री शेंदारकर/ग-४/३४६७/२०१८, दिनांक १६/०७/२०१८ च्या संदर्भात कळविण्यात येते की, श्री.रामकृष्ण रतनराव शेंदारकर, पुरूष परिसेवक, छत्रपती प्रमिलाराजे सर्वोपचार रूग्णालय, कोल्हापूर यांची मुलगी कु.श्रेया रामकृष्ण शेंदारकर हिस उद्भवलेल्या (५०% Scald burn over both Thigh Rt.upper extrimities, Chest, abdom Back Abdo) आकस्मिक आजारावर नॅशनल बर्न सेंटर, नवी मुंबई या खाजगी रूग्णालयात दि.११.११.२०१६ ते १२.१२.२०१६ पर्यंत (३२ दिवस) आंतररुग्ण म्हणून घेतलेल्या औषधोपचारावरील झालेल्या एकूण रु.६,११,७२८/- इतक्या वैद्यकीय खर्चापैकी अनुज्ञेय ठरणारी रु. ४,९९,०१२/- (अक्षरे रूपये :- चार लाख नव्याण्णव हजार बारा फक्त) एवढया वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम १९६१ मधील नियम २ (५) मधील तरतूदी व त्यानंतर त्या अनुषंगाने शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयानुसार शासकीय अथवा शासनमान्य खाजगी रुग्णालयात शासनाने विनिर्दिष्ट केलेल्या आकस्मिकपणे उद्भवणाऱ्या २७ आकस्मिक व ५ गंभीर आजारासाठी झालेल्या (शस्त्रक्रिया, त्याअनुषंगिक औषधोपचार आणि रुग्णालयातील वास्तव्यावरील खर्च) शासन निर्णय दि.१९.०३.२००५ च्या अन्वये शासकीय कर्मचारी / अधिकारी यांना वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती अनुज्ञेय ठरते.

३. श्री.रामकृष्ण रतनराव शेंदारकर, पुरूष परिसेवक, छत्रपती प्रमिलाराजे सर्वोपचार रूग्णालय, कोल्हापूर यांची मुलगी कु.श्रेया रामकृष्ण शेंदारकर हिस उद्भवलेल्या (५०% Scald burn over both Thigh Rt.upper extrimities, Chest, abdom Back Abdo) आकस्मिक आजारासंदर्भात झालेल्या खर्चास अधिक्षक, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रूग्णालय, औरंगाबाद यांनी त्यांच्या दिनांक २६.०४.२०१७ च्या पत्रान्वये प्राधिकृत वैद्यकीय देखभाल अधिकारी म्हणून प्रमाणित केले असल्यामुळे श्री.शेंदारकर यांनी त्यांच्या मुलीच्या आकस्मिक आजारावर झालेल्या

वैद्यकीय खर्चास शासन निर्णय, १९/०३/२००५ मधील परिच्छेद क्र. १ (१) नुसार शस्त्रक्रीया व त्यावरील उपचार यावर झालेल्या सरसकट खर्चाच्या ९०% प्रतिपूर्तीस व परिच्छेद क्र. (१) (२) मधील तक्ता -ब मध्ये निर्धारित केलेल्या सुधारित दरानुसार रुग्णालयात केलेल्या वास्तव्यावरील खर्चाची प्रतिपूर्ती अनुज्ञेय ठरते.

४. श्री.रामकृष्ण रतनराव शेंदारकर, पुरूष परिसेवक यांच्या मुलीस उद्भवलेल्या आकस्मिक आजारावर उपचार करण्यासाठी नॅशनल बर्न सेंटर, नवी मुंबई या खाजगी रूग्णालयात दि.११.११.२०१६ ते १२.१२.२०१६ पर्यंत (३२ दिवस) पर्यंत आंतररुग्ण म्हणून झालेला वैद्यकीय खर्च व त्यानुषंगाने अनुज्ञेय ठरणारी रक्कम याबाबतचा तपशिल खालीलप्रमाणे :-

| अ.क्र. | तपशिल | प्रत्यक्ष खर्च (रू.) | अभिप्राय (प्रत्यक्ष खर्चाच्या) | एकूण अनुज्ञेय रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | अ) शस्त्रक्रिया व औषधोपचाराचा एकूण खर्च | ६११७२८ | -- | -- |
| | ब) अनुज्ञेय नसलेली रक्कम | | -- | -- |
| | क) वास्तव्याचा खर्च | ५३२७० | | |
| | **एकूण = (अ - ब - क)** | १२१५०० | ९०% | **३९३२६२** |
| २ | रूग्णालयीन वास्तव्य बाथारूमसह स्वतंत्र कक्ष | ४३६९५८ | ७५% | **४७२५०** |
| ३ | अतिदक्षता कक्ष(आय.सी.सी.यु.) | ६३००० | १००% | **५८५००** |
| | एकूण:- ४,९९,०१२/- | | | |
| | **(अक्षरे रूपये :- चार लाख नव्याण्णव हजार बारा फक्त)** | | | |

५. उपरोक्त नमूद केलेल्या वैद्यकीय खर्चाची रक्कम रुपये ३,००,०००/- पेक्षा जास्त असल्याने अशा देयकांच्या रक्कमा मंजूर करण्यास विभागीय कार्यालयास अधिकार नसल्याने अशी देयके सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.वैखप्र-२०१६/प्र.क्र.१६/२०१६/राकावि-२, दि.१६.०३.२०१६ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. २ मधील उपपरिच्छेद क्र. (२) नुसार मंत्रालयीन प्रशासकीय प्रमुखास मंजूर करण्याचे अथवा उचित निर्णय घेण्याचे पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत.

६. श्री.रामकृष्ण रतनराव शेंदारकर, पुरुष परिसेवक, छत्रपती प्रमिलाराजे सर्वोपचार रूग्णालय, कोल्हापूर यांची मुलगी कु.श्रेया रामकृष्ण शेंदारकर हिस उद्भवलेल्या (५०% Scald burn over both Thigh Rt.upper extrimities, Chest, abdom Back Abdo) आकस्मिक आजारासंदर्भात झालेल्या वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीच्या प्रस्तावासोबत जी अन्य आवश्यक ती प्रमाणपत्रे शासनास सादर केलेली आहेत, ती शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील मार्गदर्शक तत्वानुसार/निकषानुसार सादर केली असून ती सर्व वैध ठरत असल्याने झालेल्या वैद्यकीय खर्चाच्या रक्कमेची

प्रतिपूर्तता [रु. ४,९९,०१२/- (अक्षरे रूपये :- चार लाख नव्याण्णव हजार बारा फक्त)] वर नमूद केलेल्या परिच्छेद क्र. ५ मधील तक्यातील रकाना क्र. ६ मध्ये केलेल्या परिगणनेनुसार त्यांना अनुज्ञेय ठरते.

७. वरील बाबींवर होणारा खर्च सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षासाठी मंजूर केलेल्या अनुदानातून पुढे नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मुख्य लेखा शिर्ष -

मागणी क्र.एस-१

२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,

०१- नागरी आरोग्य सेवा-विषमचिकित्सा,

११०- रूग्णालये व दवाखाने

(०२) (१५) सर्वोपचार रूग्णालय, कोल्हापूर

संगणक सांकेतांक (२२१० ५०९५)

०१ वेतने.

८. सदर ज्ञापनाव्दारे मंजूर करण्यात येणारी रक्कम श्री.शेंदारकर, पुरूष परिसेविका यांना मंजूर करुन अदा करण्यासाठी अधिष्ठाता, छत्रपती प्रमिलाराजे सर्वोपचार रूग्णालय, कोल्हापूर यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच त्यांना असे सूचित करण्यात येते की, श्री.शेंदारकर, पुरूष परिसेविक यांना यापूर्वी शासनाकडून सदर आजारासाठी वैद्यकीय अग्रिम मंजूर केले असल्यास, त्या अग्रिमापोटीची रक्कम समायोजित करुन शिल्लक अनुज्ञेय असलेली वैद्यकीय खर्चाची रक्कम अदा करण्यात यावी, याशिवाय असेही सूचित करण्यात येते की, अनावधानपणे अनुज्ञेय नसणाऱ्या रक्कमांचाही मंजूर केलेल्या रक्कमेत समावेश असल्यास अशा जादा प्रदान केलेल्या रक्कमांची संबंधितांकडून वसूल करण्यास संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई हे सक्षम राहतील.

९. सदरचे ज्ञापन हे सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.वैखप्र-२०११/प्र.क्र.३३३/ ११/राकावि-२, दिनांक १६/११/२०११ मधील परिच्छेद क्र. २ (२) अन्वये व क्र. एमएजी २००५/९/प्र.क्र.१/आरोग्य-३, दि. १९/०३/२००५ अन्वये प्रशासकीय प्रमुखास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**१०.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२२०१२१२४९२३१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dattatraya Ekanath Ghanavat

Digitally signed by Dattatraya Ekanath Ghanavat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education and Drugs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e754dcfc3ad39b1f1ee734fb62ca6c0558ffcae55bba934d42bad451952ab66c, serialNumber=2f161bc485abcbf56c592541f63a01c891a0b9fc64a67387f5d785197f14e51e, cn=Dattatraya Ekanath Ghanavat
Date: 2019.02.20 12:16:51 +05'30'

**(द.ए. घनवट)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

अधिष्ठाता, छत्रपती प्रमिलाराजे सर्वोपचार रूग्णालय, कोल्हापूर यांचकडे श्री.रामकृष्ण रतनराव शेंदारकर, पुरूष परिसेवक यांनी सादर केलेल्या वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्ती संदर्भातील मूळ कागदपत्रासह पुढील योग्य त्या कार्यवाहीसाठी सादर.

**प्रत -:**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) महाराष्ट्र राज्य-१, मुंबई.
२. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर.
४. श्री.रामकृष्ण रतनराव शेंदारकर, पुरूष परिसेवक, छत्रपती प्रमिलाराजे सर्वोपचार रूग्णालय, कोल्हापूर.
५. निवडनस्ती (परिचर्या).

*****************